**महाराष्ट्र वन विकास महामंडळातील वन परिक्षेत्र अधिकारी या संवर्गातील सरळ सेवेने पदे भरणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:एफडीसी-२०१४/प्र.क्र.१००/फ-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक. १८ मार्च, २०१५

**संदर्भ:**-१) महाराष्ट्र वन विकास महामंडळाचे पत्र क्र. प्रशा/आस्था/३१४५/३४५, दिनांक १८ नोव्हेंबर,२०१४ व पत्र क्र. प्रशा/आस्था/३१४५/४७५१, दिनांक २४ फेब्रुवारी,२०१५
२) शासन निर्णय क्रमांक एफडीसी-२०१०/४३२/प्र.क्र.७७/फ-५, दि.२४ जानेवारी, २०११
३) शासन निर्णय क्रमांक मलोआ-२०१०/प्र.क्र.२८०/१०/आठ मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक ८ एप्रिल, २०११

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र वन विकास महामंडळाकरिता एकूण १६८८ पदाच्या आकृतीबंधाच्या आढाव्यास शासनाकडून उपरोक्त संदर्भाधिन पत्र क्र. २ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार वनपरिक्षेत्र अधिकारी या संवर्गाकरिता १२५ पदे मंजूर आहेत.

महाराष्ट्र वन विकास महामंडळाच्या सेवाभरती नियमाप्रमाणे ५०% म्हणजे ६२ पदे सरळसेवा भरतीने भरावयाची आहेत. या ६२ पदांच्या भरतीच्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाकडून बिंदूनामावली (रोस्टर रजिस्टर) दिनांक ३१.१.२०११ अखेर पर्यन्त प्रमाणीत करुन घेण्यात आली आहे. वन विकास महामंडळाच्या आस्थापनेवरील वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यांची दिनांक ३१/१/२०११ अखेरपर्यंत कार्यरत पदे विचारात घेवून शासन निर्णय क्र. एफडीसी-२०१४/प्र.क्र.१००/फ-५ दिनांक २२/७/२०१४ अन्वये ४७ वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यांची सरळसेवेने भरती करण्यास मान्यता देण्यात आली होती. भरती प्रक्रियेत प्रवर्गनिहाय ४७ उमेदवारांची निवड करण्यात आली व २१ उमेदवार प्रतिक्षा यादीत ठेवण्यात आले. तथापि दोन्ही यादीमधून फक्त ४० उमेदवार १८ महिन्याचे प्रशिक्षणास पाठविण्यात आले आहे. ४० प्रशिक्षणार्थीचा कालावधी हा अनुक्रमे ३१ ऑगस्ट २०१५ व ३० सप्टेंबर, २०१५ रोजी संपत आहे. त्यांनतर त्याचा परिविक्षाधिन कालावधी १८ महिन्याचा आहे. म्हणजेच साधारणपणे ३ वर्षानंतर नियमित पदस्थापने करिता ४० प्रशिक्षणार्थी उपलब्ध होतील. सद्य:स्थितीत वनपरिक्षेत्र अधिकारी यांची २१ पदे रिक्त आहेत.

वनपरिक्षेत्र अधिकारी हे पद एफडीसीएम लि. च्या क्षेत्रिय कामासाठी आधारस्तंभ आहे. सरळसेवा भरतीची पदे रिक्त असल्यामुळे वनपालांना तदर्थ तत्वावर पदोन्नती देऊन कामे करण्यात येत आहे. ही व्यवस्था दिर्घकाळ ठेवणे महामंडळाचे हिताचे उचित होणार नाही. अशा परिस्थितीत वनपरिक्षेत्र अधिकारी सरळसेवा भरतीच्या वाटाघटीत २१ पदे भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामान्य प्राशासन विभागाचा शासन निर्णय दिनांक २१/०२/२०१५ व दिनांक २/३/२०१५ मधील तरतूदीच्या अधीन राहून महाराष्ट्र वन विकास महामंडळाने उपरोक्त संदर्भाधिन पत्र क्रमांक १ मध्ये नमूद केल्यानुसार वनपरिक्षेत्र अधिकारी या संवर्गात १२५ पदे मंजूर असल्याने, सेवाप्रवेश नियमानुसार ही पदे ५० टक्के पदोन्नतीने भरण्याची तरतूद आहे. त्यानुसार सरळसेवेच्या कोटयात ६२ पदे उपलब्ध होतात.

महाराष्ट्र वन विकास महामंडळाने अहवालात नमूद केल्यानुसार या संवर्गात मंजूर पदे, भरलेली पदे व रिक्त पदे याबाबतचा तपशिल खालील प्रमाणे.

| अ. क्र. | तपशिल | अ. जा. | अ.ज. | विजाअ | भजब | भजक | भजड | विमाप्र | इमाव | खुला | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १३% | ७% | ३% | २.५% | ३.५% | २% | २% | १९% | ४८% | १००% |
| १ | मंजूर पदे | ८ | ४ | २ | २ | २ | १ | १ | १२ | ३० | ६२ |
| २ | कार्यरत कर्मचारी | ६ | ४ | २ | २ | २ | १ | १ | ९ | १४ | ४१ |
| **३** | **रिक्त पदे** | **२** | - | - | - | - | - | - | **३** | **१६** | **२१** |
| **३** | **मागणी पत्रासाठी उपलब्ध पदे** | **२** | - | - | - | - | - | - | **३** | **१६** | **२१** |

वरील तक्त्यातील अनु क्र. ४ चे अवलोकन करता या संवर्गात सध्या रिक्त अ.जा.२, इमाव-३ व खुला-१६ अशी २१ पदे मागणीपत्रासाठी उपलब्ध आहे.

- **चालू आरक्षणाची पदे- अ.जा. २, इ.मा.व.-३ व खुला- १६ अशा एकूण २१ पदांचे मागणीपत्र पाठविण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

महाराष्ट्र वन विकास महामंडळातील वनपरिक्षेत्र अधिकारी या संवर्गातील पदे सरळसेवेतून भरतीकरण्यासाठी वन विभागाच्या सचिवांनी व सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेली आहे. महाराष्ट्र वन विकास महामंडळातील वनपरिक्षेत्र अधिकारी या संवर्गातील पदे भरतांना खालील अटींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१. वरील प्रमाणे मान्यता दिलेल्या सर्व पदांसाठी होणाऱ्या संपूर्ण खर्चाची जबाबदारी पूर्णपणे महाराष्ट्र वन विकास महामंडळाची राहील, यासाठी शासनाच्या एकत्रित निधीतून कोणतीही तरतूद उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.
२. वन विभागातील सरळसेवा भरती संबंधी सेवाप्रवेश नियमानुसार वन परिक्षेत्र अधिकारी यांच्यासाठी जी अर्हता आवश्यक आहे (शैक्षणिक, वय, शारीरीक क्षमता इ.) तीच अर्हता ठेवण्यात यावी.
३. भरती प्रक्रियेमध्ये स्पर्धा परीक्षा, शारीरीक क्षमता चाचणी व मुलाखत इत्यादी बाबींचा समावेश असावा.

४. निवड केल्यानंतर, वैद्यकीय तपासणी व आरक्षनानुसार जातवैधता प्रमाणपत्राच्या आधारे नियुक्ती देण्यात यावी.
५. वरील सुचना तसेच भरती प्रक्रिया राबवितांना सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या बिंदुनामावलीनुसार सरळसेवा भरती प्रक्रिया करण्यात यावी. त्याचप्रमाणे दि. १९.११.२००३ च्या परिपत्रकातील बाबींची देखील पूर्तता करण्यात यावी.
६. वनपरिक्षेत्र अधिकारी या संवर्गातील पदे भरतांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या भरती नियमांचे निकष लावण्यात यावेत.
७. महिला, खेळाडू आणि तत्सम प्रवर्गाकरिता शासनाने ठरवून दिलेल्या धोरणानुसार आरक्षण ठेवण्यात यावे.

सदर सहमती ही केवळ सामाजिक आरक्षणाच्या अनुषंगाने देण्यात येत आहे. समांतर आरक्षणाबाबत महाराष्ट्र वन विकास महामंडळाने आपल्या स्तरावर योग्य ती कार्यवाही करावी.

सुधारीत बिंदुनामावली पुढील कार्यवाहीसाठी शासनास तात्काळ उपलब्ध करुन देण्यात यावी.

उपरोक्त शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपरीक संदर्भ क्र.२१९/ दि.१२/३/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१८१५०२०२३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेनुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.03.18 15:13:15 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, १२, रॉवेल प्लाझा कडबी चौक, कामठी रोड, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य , नागपूर
३. महाव्यवस्थापक / विभागीय व्यवस्थापक (सर्व)
४. खाजगी सचिव, मा. मंत्री (वने),मंत्रालय, मुंबई
५. स्वीय सहाय्यक, सचिव (वने)
६. निवड नस्ती /फ-५